सन २०१८-२०१९ या वर्षात राज्यातील कांदा उत्पादक शेतकऱ्यांना प्रति क्विंटल रुपये २००/- अनुदान देणेबाबत.
(कालावधीत वाढ)

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सपस-२०१८/प्र.क्र.३६७ /२४ स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
दिनांक:- ३१ जानेवारी, २०१९

संदर्भ:- १) मंगळवार, दिनांक ११ डिसेंबर,२०१८ रोजीचा मंत्रिमंडळ निर्णय
२) गुरुवार, दिनांक २० डिसेंबर,२०१८ रोजीचा मंत्रिमंडळ निर्णय
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक: सपस-२०१८/प्र.क्र.३६७ /२४ स, दिनांक २६ डिसेंबर,२०१८
४) मंगळवार, दिनांक २२ जानेवारी,२०१९ रोजीचा मंत्रिमंडळ निर्णय

**शासन निर्णय:-**

२०१८ मध्ये राज्यात ऑक्टोबर, २०१८ नंतर कांद्याच्या दरात झालेल्या घसरणीच्या पार्श्वभूमीवर, संदर्भाधीन दिनांक २६/१२/२०१८ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समित्या/खाजगी बाजार समितीमध्ये दिनांक १ नोव्हेंबर, २०१८ ते १५ डिसेंबर, २०१८ या कालावधीत कांदा विक्री केलेल्या शेतकऱ्यांना रुपये २०० प्रति क्विंटल आणि जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी या प्रमाणात अनुदान मंजूर करण्यात आले आहे. तथापि, १५ डिसेंबर, २०१८ नंतरही कांद्याला मिळणारे बाजारभाव कमी असल्याने कांदा अनुदानाचा कालावधी दिनांक ३१ डिसेंबर, २०१८ पर्यंत वाढविण्याची मागणी शेतकरी, शेतकरी संघटना, स्थानिक लोकप्रतिनिधींकडून होत होती. त्यानुषंगाने कांदा अनुदानाचा कालावधी दिनांक ३१ डिसेंबर, २०१८ पर्यंत वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय, दिनांक २६/१२/२०१८ अन्वये मंजूर केलेल्या कांदा अनुदानाचा कालावधी दिनांक १ नोव्हेंबर २०१८ ते दिनांक १५ डिसेंबर, २०१८ पर्यंत निश्चित केलेला आहे. सदर कालावधी वाढवून सुधारित कालावधी दिनांक १ नोव्हेंबर २०१८ ते दिनांक ३१ डिसेंबर, २०१८ असा निश्चित करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत वाढीव कालावधीमधील योजनेच्या अंमलबजावणीच्या अटी व शर्ती शासन निर्णय, दिनांक २६/१२/२०१८ मध्ये नमूद केल्याप्रमाणेच राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१९०१३११२२७१२४५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Anoop Kumar
Date: 2019.01.31 12:38:41 +05'30'

**( अनूप कुमार )**
**प्रधान सचिव (पणन)**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (पणन) मंत्रालय, मुंबई
५) मा. सर्व मंत्री व राज्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे मंत्रालय, मुंबई
७) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८) मा.अ.मु.स. ( वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे
१०) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
१२) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
१३) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
१४) अध्यक्ष/सचिव, कृषि उत्पन्न बाजार समिती (सर्व)
१५) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
१८) अवर सचिव, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९) निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.